


# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक दुरूस्ती-०१२२/प्र.क्र.११ /पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक **२२ मार्च, २०२२.**

**विषय** :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिपत्याखालील पाली हील रोड, बांद्रा (प), मुंबई येथील पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-९,मुंबई कार्यालयाच्या पोलीस इमारतीच्या तळमजल्यावरील सहाय्यक पोलीस आयुक्त या कार्यालयाच्या दरवाजे, खिडक्या, प्लास्टर, रंगकाम इ. स्थापत्य विषयक बाबींचे नुतनीकरण करण्यासाठी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**संदर्भ** :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. CP/Dep.Sec(H)/D-८(१२)/Bldg.Br./८८/R/SML/Gov-०४/२०२२, दिनांक १२/०१/२०२२.

**ज्ञापन.-**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांनी पाली हील रोड, बांद्रा (प), मुंबई येथील पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-९,मुंबई कार्यालयाच्या पोलीस इमारतीच्या तळमजल्यावरील सहाय्यक पोलीस आयुक्त या कार्यालयाच्या दरवाजे, खिडक्या , प्लास्टर, रंगकाम इ. स्थापत्य विषयक बाबींचे नुतनीकरण करण्यासाठी मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचेकडून प्राप्त झालेले **रु.२४,१४,००६/- (रुपये चोवीस लाख चौदा हजार सहा फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास** प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा पुढीलप्रमाणे प्रस्ताव सादर केला आहे.

| अ.क्र. *(१)* | कामाचे नाव *(२)* | खर्चाचे अंदाज *(३)* |
|---|---|---|
| १. | मुळ गौण बांधकामांतर्गत पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-९, बांद्रा (प), मुंबई येथे तळमजला येथील सहाय्यक पोलीस आयुक्त कार्यालयाचे नुतनीकरण करणे. | ₹२४,१४,००६/- |
| | **एकूण- (रुपये चोवीस लाख चौदा हजार सहा फक्त)** | **₹२४,१४,००६/-** |

२. सदर कामासाठी उप विभागीय अभियंता, अंधेरी (सा.बां.) उप विभाग, अंधेरी (प), मुंबई-५८ यांनी सन २०२०-२१ च्या मुंबई ई-दरसूची व अधिक्षक अभियंता, मुंबई (सा.बां.) मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.अअ/ मुंम / रेचिशा/दरसुची/३०४०, दि.०१/०४/२०१९ मधुन दर घेऊन पुढीलप्रमाणे एकूण ₹२४,१४,००६/- इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक तयार केले असून ते कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई (सा.बां.) विभाग, अंधेरी (प), मुंबई-५८ व अधिक्षक अभियंता, मुंबई (सा.बां.) मंडळ, मुंबई यांनी साक्षांकित केले आहे. तसेच सदर अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, सा.बा. मुंबई विभाग यांनी तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे.

३. त्या अनुसार, **पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-९,मुंबई कार्यालयाच्या पोलीस इमारतीच्या तळमजल्यावरील सहाय्यक पोलीस आयुक्त या कार्यालयाच्या** दरवाजे, खिडक्या, प्लास्टर, रंगकाम इ. स्थापत्य विषयक बाबींचे **नुतनीकरण करण्यासाठी सोबतच्या विवरणपत्रामधील "Recapitulation Sheet" नुसार एकूण ₹२४,१४,००६/- (रुपये चोवीस लाख चौदा हजार सहा फक्त)** इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटींवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरू करू नये.

२) खर्चाचे अंदाज हे पोलीस सह आयुक्त (प्रशासन), बृहन्मुंबई, यांनी साक्षांकित करणे आवश्यक आहे.

**४.** उक्त रक्कम अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरित करण्यासाठी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, मुंबई यांना **"नियंत्रक अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे.तर त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिकारी यांना **"आहरण व संवितरण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहेत.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, ००, १०८, राज्य मुख्यालय पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२)(०१) शहर पोलीस-आस्थापना (दत्तमत)(अनिवार्य) (२०५५ ००९७), २७, लहान बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन, शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ व दिनांक २० सप्टेंबर, २०१९ अन्वये वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनु. क्र.१ अनुसार प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारान्वये व सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परि.क्र.१३४ (३) मधील तरतुदीनुसार शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९ मधील तरतूदीनुसार व शासन निर्णय वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ अन्वये दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२२१६४३४२३८२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NARAYAN BIRA MANE

Digitally signed by NARAYAN BIRA MANE
DN: CN = NARAYAN BIRA MANE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = ï¿¿HOME DEPARTMENT
Date: 2022.03.22 17:54:47 +05'30'

**( नारायण बिरा माने )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

**प्रत-**

१) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई.
२) कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई (सा.बां.) विभाग, अंधेरी (प), मुंबई-५८.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
५) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कार्यासन अधिकारी (व्यय-७/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवड फाईल (पोल-७).